**सन २०२४-२५ करीता डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटीकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण (२४०६ ८६१३) या राज्यस्तरीय योजनेंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सावन-२०२४/प्र.क्र.४०/(१)/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२५

वाचा:-

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक-सावनि-२०२२/प्र.क्र.५८/फ-११, दि.२८.०७.२०२३
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२३/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांकीत दि.२९.११.२०२४, दि.०४.०३.२०२५ व दि.३१.०३.२०२५
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२३/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१७.०३.२०२५
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक पी/यो/नबाप्र/प्र.क्र.११/११७५/२०२४-२५, दि.११.०३.२०२५.
६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक पी/यो/नबाप्र/प्र.क्र.११/१३१३/२०२४-२५, दि.३१.०३.२०२५.

प्रस्तावना :-

सामाजिक वनीकरणाचे महत्त्व लक्षात घेऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरिता सामाजिक वनीकरणांतर्गत "डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटीकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण" (२४०६ ८६१३) या योजनेंतर्गत सन २०२४-२५ करिता ५०- इतर खर्च या उदिष्टाखाली रू.३५००.०० लक्ष इतका करण्यात आलेला अर्थसंकल्पीत निधी सुधारीत अंदाजानुसार रू.२४५०.०० लक्ष इतका करण्यात आला आहे.

२. वित्त विभागाच्या वाचा क्रमांक ४ येथील दि.१७.०३.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये ५०-इतर खर्च या उद्दिष्टाकरीता कार्यक्रमांतर्गत खर्चाचे निधी वितरणासाठी नियोजन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग यांच्यामार्फत वित्त विभागास सादर करण्यात यावेत, अश्या सूचना देण्यात आलेल्या होत्या. त्यानुसार नियोजन विभागाच्या मार्फत वित्त विभागाने **रू.२४५०.०० लक्ष** इतका निधी बीम्स प्रणालीवर वितरीत केला आहे.

३. वाचा क्रमांक १ येथील दि.२८.०७.२०२३ शासन निर्णयान्वये वनीकरण आणि मृद व जलसंधारण कामांसाठी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना व योजनांतर्गत योजनांचे अभिसरण करून सदर अभिसरण योजनेंतर्गत फरकाची रक्कम अदा करण्याच्या प्रारुपास (Top-up model) मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार "डॉ. बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटीकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण" (२४०६ ८६१३) या योजनेंतर्गत करण्यात येणारी सर्व कामे सुध्दा अभिसरण योजनेंतर्गत करणे अभिप्रेत आहे. त्यानुसार वाचा क्रमांक ३ येथील दि.२९.११.२०२४, दि.०४.०३.२०२५ व दि.३१.०३.२०२५ रोजीच्या शासन निर्णयांन्वये **रु.२४५०.०० लक्ष** इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

४. आता, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वाचा क्र.६ येथील पत्रान्वये, वाचा क्र.३ येथील शासन निर्णय दि.२९.११.२०२४ अन्वये छत्रपती संभाजीनगर वनवृत्तांमधील जालना वनविभागातील वनप्रशिक्षण संस्था, जालना या रोपवाटीकेकरिता रु.३८.९२ लक्ष मंजूर करण्यात आलेले होते. परंतु वनप्रशिक्षण संस्था, जालना रोपवाटिकेचे क्षेत्र नगरपालिका क्षेत्रात येत असल्याने सदर ठिकाणी अभिसरणअंतर्गत कामे करता येणे शक्य नसल्याने सदरचे ठिकाण बदलण्याकरिता वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण छत्रपती संभाजीनगर यांना सुचना देण्यात आल्या असून अद्यापही सदरचे ठिकाण बदलले असल्याबाबत सामाजिक वनीकरण छत्रपती संभाजी नगर यांनी या कार्यालयास कळविलेले नाही. करिता रु.३८.९२ लक्ष अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर शिल्लक आहे. सदर शिल्लाक निधी नागपूर वनवृत्ताचे, नागपूर वन विभागातील खैरी बाजारगाव रोपवाटिकेसाठी वाचा क्र.५ येथील दि.११.०३.२०२५ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने खर्च करण्यास मान्यता देण्याची विनंती केली आहे. त्याअनुषंगाने निधी खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या "डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटीकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण" (२४०६ ८६१३) या योजनेंतर्गत ५०- इतर खर्च या उद्दिष्टाखाली पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार **रू.३८.९२ लक्ष** इतका निधी खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**(रू.लाखात)**

| अ.क्र. | वनवृत्त | वन विभाग | रोपवाटिकेचे नाव | हेक्टर | प्रस्तावित मागणी | यापुर्वीवितरीत निधी | या शा.नि. अन्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १. | नागपूर | नागपूर | खैरी | १३.४१ | ९६.२६ | ७.८५ | ३८.९२ |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | बाजारगाव | | | | |
| | | गडचिरोली | गडचिरोली | ११ | ४६.२८ | ७.८२ | ००.०० |
| | | | | **एकूण** | **१४२.५४** | **१५.६७** | **३८.९२** |

२. उपरोक्त वितरीत करण्यात येत असलेला निधी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार, विहीत अटी व शर्तीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर हे वर्ष २०२४-२५ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील.

४. सदर निधी वितरित करण्यापूर्वी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२४-२५ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

५. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या वाचा क्रमांक २ व ४ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

६. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

७. सदर योजनेंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणीक्र. सी-७,**

**२४०६ वनीकरण व वन्यजीवन, (योजनांतर्गत)**

**(०३) (०४) डॉ. बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटीकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण (२४०६ ८६१३) ५०- इतर खर्च**

८. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे दि.१७.०३.२०२५ रोजीचे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक-विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३३११८३२०२६९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRATAP RAJENDRA SATPUTE

Digitally signed by PRATAP RAJENDRA SATPUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=46e55cdbf3321ecaa0de879cc768619afcdbda90e6691b3baf2255384355942f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=47A54DFAE5D873AD7624C29CACBF61D571ADA2CBEECE334AB2E56A179C9FF19F, cn=PRATAP RAJENDRA SATPUTE
Date: 2025.03.31 18:33:08 +05'30'

**( प्रताप राजेंद्र सातपुते )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख ), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
५. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण (६ वृत्त)
६. विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे)
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
१०.निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
११.वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२.कार्यासन अधिकारी, फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३.कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४.उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५.निवडनस्ती फ-११.